**शैक्षणिक वर्ष २०१५-१६ मध्ये सर ज. जी. कला महाविदयालय, मुंबई व सर ज. जी. उपयोजित कला महाविदयालय, मुंबई या शासकीय कला महाविदयालयांमध्ये पदव्युत्तर पदवी (MFA) अभ्यासक्रम सुरु करण्याबाबत....**

**महाराष्ट्र शासन**
**उच्च व तंत्र शिक्षण विभाग**
**शासन निर्णय क्रमांकः- एडीआर-२०१३/(२२२/१३)/तांशि-६,**
**मंत्रालय, मुंबई- ४०००३२.**
**दिनांक:- १८ मे, २०१५**

**पहावे: १) कला संचालनालयाचे पत्र, क्र. डिओअे-२०१४/तीन/२४३२, दि. २५/९/२०१४**

**प्रस्तावना:-**

कला संचालनालयाच्या संदर्भाधिन दि. २५/९/२०१४ च्या पत्रान्वये सर ज. जी. कला महाविदयालय, मुंबई व सर ज. जी. उपयोजित कला महाविदयालय, मुंबई येथे पदव्युत्तर पदवी (Master of Fine Arts) अभ्यासक्रम सुरु करण्यास मान्यता देण्याबाबतचा प्रस्ताव प्राप्त झाला होता. अखिल भारतीय तंत्र शिक्षण परीषदेच्या मानके व निकषाप्रमाणे प्राध्यापक / प्राचार्य पदाच्या सेवाप्रवेश नियमामध्ये MFA व Ph.D. ही शैक्षणिक अर्हता अनिवार्य केली असल्याने व शैक्षणिक समानीकरण्याच्या धोरणानुसार शासकीय कला संस्थांमध्ये विद्यार्थ्यांना उच्च शिक्षणाच्या आणि विविध रोजगाराच्या संधी उपलब्ध करुन देण्याच्या दृष्टीने कला संचालनालयाच्या अखत्यारीतील सर . ज. जी.कला महाविदयालय व सर ज.जी. उपयोजित कला महाविदयालय, मुंबई या शासकीय कला महाविदयालयात पदव्युत्तर पदवी अभ्यासक्रम (MFA By Papers and MFA By Research) सुरु करण्यास मान्यता देण्याबाबतचा प्रस्ताव शासनाच्या विचाराधीन होता.

**शासन निर्णय:-**

ललीत कलेतील दृककला (Visual Art) या विषयातील पदव्युत्तर पदवी अभ्यासक्रम (Master of Fine Arts By Papers and Master of Fine Arts By Research) खाली नमुद केलेल्या महाविदयालयामध्ये, रकाना क्र.३, ४ व ५ येथे दर्शविल्यानुसार अभ्यासक्रम / विषय व प्रवेश क्षमतेसह सन २०१५-१६ या शैक्षणिक वर्षापासून सुरु करण्यास शासन मान्यता देण्यात येत आहे.

| अ.क्र. | संस्थेचे / महाविदयालयाचे नाव व ठिकाण | मान्यता दिलेले अभ्यासक्रम / विषय | प्रवेश क्षमता बाय पेपर्स | प्रवेश क्षमता बाय रिसर्च |
|---|---|---|---|---|
| १ | सर ज.जी. कला महाविदयालय, मुंबई | १) शिल्पकला<br>२) वस्त्रसंकल्प<br>३) धातुकाम<br>४) मातकाम<br>५) अंतर्गत गृहसजावट | ५<br>५<br>५<br>५<br>५ | २<br>२<br>२<br>२<br>२ |
| २ | सर ज.जी. उपयोजित कला महाविदयालय, मुंबई | उपयोजित कला<br>१) इलेस्ट्रेशन<br>२) टायापोग्राफी<br>३) फोटोग्राफी<br>४) कॉम्प्युटर ग्राफीक्स<br>५) एक्झिबिशन डिस्प्ले व डिझाईन | ५<br>५<br>५<br>५<br>५ | २<br>२<br>२<br>२<br>२ |

या अभ्यासक्रमासाठी विद्यार्थ्यांकडून प्रतिवर्षी १) शिक्षण शुल्क - रु. १५०००/- २) स्टुडिओ व लॅब शुल्क - रु. १००००/- ३) इतर खर्च - रु.५०००/- असे एकूण रु. ३००००/- इतके शुल्क आकारण्यास मान्यता देण्यात येत आहे.

२. महाविदयालयाने खालील अटी व शर्तींची पूर्तता करणे आवश्यक राहील.

१) या अभ्यासक्रमासाठी विद्यापीठाची संलग्नता घेण्यात यावी. सदर अभ्यासक्रमासाठी अधिकचा अध्यापकवर्ग व कर्मचारी वर्ग, याबाबत मागणी करण्यात येणार नाही.

२) या अभ्यासक्रमांपैकी ज्या अभ्यासक्रमांना अखिल भारतीय तंत्र शिक्षण परिषदेची मान्यता आवश्यक आहे. त्यास अखिल भारतीय तंत्र शिक्षण परिषदेची मान्यता घेण्यात यावी.

३) विद्यापीठाने विहित केलेल्या निकषानुसार व विद्यापीठ अनुदान आयोगाने, तसेच अखिल भारतीय तंत्र शिक्षण परिषद यांनी विहित केलेल्या शैक्षणिक पात्रतेनुसार अध्यापक वर्ग / कर्मचारी वर्ग महाविदयालयाने या अभ्यासक्रमासाठी नेमणे आवश्यक असून इतर सर्व आवश्यक पायाभूत सोयी- सुविधा महाविद्यालयात उपलब्ध करुन देणे बंधनकारक असेल.

४) महाविदयालयाने कोणत्याही परिस्थितीत या अभ्यासक्रमास मंजूर क्षमतेपेक्षा जास्त प्रवेश देऊ नये.

५) राज्यातील शासकीय कला महाविदयालये व अशासकीय महाविदयालयांच्या शैक्षणिक शुल्क व इतर शुल्क वाढीचा प्रस्ताव विचाराधीन आहे. सदर प्रस्तावास मान्यता होईपर्यंत या आदेशानुसार शैक्षणिक शुल्क आकारण्यात यावे.

६) महाविदयालयाने विद्यार्थ्यांसाठी आकारण्यात आलेल्या एकूण फी मधील शिक्षण शुल्काची रक्कम शासकीय कोषागारात जमा करावी व उर्वरीत शुल्क स्वीय प्रंपची लेख्यात (P.L.A) जमा करावी व त्यातून शैक्षणिक बाबीवर होणारा खर्च भागविण्यात यावा.

३. विद्यापीठाचे संलग्नीकरण घेण्याबाबत आवश्यक असलेली पुढील कार्यवाही करण्यापूर्वी विद्यापीठांनी शासनाच्या मान्यतेबाबतचे आदेश शासनाच्या संकेतस्थळावर अवलोकन करुन परवानगीबाबत खात्री करुन घ्यावी. विदयापीठांनी संलग्नतेबाबतचा पूर्तता अहवाल संचालक, कला संचालनालय, महाराष्ट्र राज्य, मुंबई यांना पाठवावा.

४. हे आदेश, राज्य शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेत स्थळावर उपलब्ध असून त्याचा संगणक सांकेतांक २०१५०४३०१७३५३२९५०८ आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

Vijay G Chandekar

Digitally signed by Vijay G Chandekar
DN: CN = Vijay G Chandekar, C = IN, S = Maharashtra, O = Government Of Maharashtra, OU = Desk Officer
Date: 2015.05.18 16:15:30 +05'30'

**(वि.गो. चांदेकर)**
कार्यासन अधिकारी, महाराष्ट्र शासन

**प्रति,**

१. कुलसचिव, मुंबई विद्यापीठ, मुंबई
२. शिक्षण संचालक (उच्च शिक्षण), महाराष्ट्र राज्य, पुणे
३. कला संचालक, कला संचालनालय, महाराष्ट्र राज्य, मुंबई
४. अधिष्ठाता, सर ज.जी. कला महाविदयालय, मुंबई
५. अधिष्ठाता, सर ज.जी. उपयोजित कला महाविदयालय, मुंबई
६. अखिल भारतीय तंत्र शिक्षण परीषद, मुंबई
७. अधिदान व लेखा अधिकारी, मुंबई
८. महालेखापाल, महाराष्ट्र (लेखा व अनुंज्ञेयता) (लेखा परीक्षा), मुंबई / नागपूर
९. मा. मंत्री, तंत्र शिक्षण यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई
१०. मा. राज्यमंत्री, उच्च व तंत्र शिक्षण यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई
११. प्रधान सचिव, उच्च व तंत्र शिक्षण यांचे स्वीय सहाय्यक, मंत्रालय, मुंबई
१२. निरीक्षक, चित्रकला व शिल्प, महाराष्ट्र राज्य, मुंबई
१३. निवड नस्ती (तांशि- ६)